**औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये प्राचार्य/ उपप्राचार्य व आदिवासी आश्रम औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये प्रकल्प अधिकारी यांचे नांवे वैयक्तिक लेखा/स्वीय प्रपंजी लेखा खाते उघडण्यास मंजूरी मिळणेबाबत.**
**"(लेखाशिर्ष २२३०-कामगार व सेवायोजन )."**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांक : अर्थसं-२४११/२०१४/प्र.क्र. १/व्यशि-२.**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १ जानेवारी, २०१५.

**वाचावे :-** (१) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक अर्थसं-२४११/२०१४/प्र.क्र. १/ व्यशि-२, दिनांक ३० ऑगस्ट, २०१४.
(२) प्रधान महालेखापाल (लेखा व हकदारी)-I, महाराष्ट्र, मुंबई कार्यालयाकडील पत्र क्रमांक : No.TM/CH. २/PLA/General/२०१४-१५/६६३, Dated ०९.१०.२०१४.
(३) प्रधान महालेखापाल (लेखा व हकदारी)-I, महाराष्ट्र, मुंबई कार्यालयाकडील अनौ. संदर्भ क्रमांक :No. TM/Ch. २/UOR/HTED/२०१४-१५/९७४, Dated १८.१२.२०१४.
(४) प्रभारी संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय प्रशिक्षण व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक :१३/लेखा/२०१४-१५/१०८८, दिनांक ०२.१२.२०१४.

**शासन शुध्दीपत्रक :-**

संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक (१) अन्वये व्यवसाय प्रशिक्षण व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील प्राचार्य व शासकीय आदिवासी आश्रम औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील प्रकल्प अधिकारी यांच्या नावे स्वीय प्रपंजी लेखा खाते (PLA) उघडण्यास मंजूरी देण्यात आली आहे. तथापि, प्रधान महालेखापाल (लेखा व हकदारी)-I, महाराष्ट्र, मुंबई कार्यालयाने संदर्भाधीन पत्र क्रमांक (२) अन्वये त्यास महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील खंड-१ च्या नियम क्रमांक-४८८ एवं ४९४ (सी) अनुसार प्रधान महालेखापाल कार्यालयाची सहमती (Concurrence) घेण्यास कळविण्यात आले. तद्नुषंगाने, प्रधान महालेखापाल (लेखा व हकदारी)-I, महाराष्ट्र, मुंबई कार्यालयास सादर करण्यात आलेल्या प्रस्तावावर, सदर कार्यालयाने संदर्भाधीन अनौ. संदर्भ क्रमांक (३) अन्वये काही अटी व शर्तीच्या अधीन राहून नावे स्वीय प्रपंजी लेखा खाते (PLA) उघण्यास सहमती (Concurrence) दिली आहे.

२. संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक (१) मधील अटी व शर्ती कायम ठेवून, प्रधान महालेखापाल (लेखा व हकदारी)-I, महाराष्ट्र, मुंबई कार्यालयाने संदर्भाधीन अनौ. संदर्भ क्रमांक (३) अन्वये दिलेल्या खालील अटी व शर्तीच्या अधीन विषयाधीन स्वीय प्रपंजी लेखा खाते (PLA) उघडण्यासाठी नव्याने मंजूरी देण्यात येत आहे :-

(i) The amount of (a) Caution Money.

(b) Gathering Fees.

(c) Contribution to student Aid Fund from Resourceful students.

(d) Scholorship to SC-ST students.

(e) Contribution to Adjustment Fund From Universites.

Should only be credited to P.L.A.

(ii) Other items listed in the G.R. dated १५.११.२०२००२ and २६.११.२००२ are revenue receipts and are required to be credited to Revenue Account of Department. Direct utilization of these receipts towards departmental expenditure is not permissible in items of Rule ८ and Rule ४८८ of MTR १९६८. The receipt of Programme Oriented Scheme may be credited to Consolidated Fund. The expenditure on development of sport ground, Student Development Fund, training of staff/officers and cleaning of Hall is revenue expenditure. Budget provision may be made for the same.

(iii) These PLAs are subject to Audit.

(iv) All other conditions in MTR Vol. I will be applicable to these PLAs.

३. प्रभारी संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी संदर्भाधीन पत्र क्रमांक (४) अन्वये विषयाधीन स्वीय प्रपंजी खाते (PLA) उघडण्यास परवानगी देण्यात आलेल्या एकूण ७४ संस्थांपैकी, शासन निर्णयासोबत जोडण्यात आलेल्या “प्रपत्र-अ” मधील अ.क्र. १२ :- “औ.प्र. संस्था दोडामार्ग, जि. सिंधुदूर्ग” यांच्यासमोर दाखविण्यात आलेले “उपकोषागार कार्यालय सावंतवाडी” हे संस्थेपासून ३५ कि.मी. दूर असल्याने, सदर स्थळी आर्थिक व्यवहार करणे गैरसोईचे होणार असल्याचे कळविले आहे. तसेच, अ.क्र. ३५ :- “औ.प्र. संस्था फुलंब्री, जि. औरंगाबाद” या संस्थेसमोर उपकोषागाराचे नांव “तळोदा” असे संचालनालयाकडून नजर चुकीने झाले असल्याचे उक्त पत्रात नमूद केले आहे. तद्रुषंगाने, संचालनालयाचे शासन निर्णयासोबत जोडण्यात आलेल्या “प्रपत्र-अ” मधील अ.क्र. १२ समोर

“उपकोषागार कार्यालय सांवंतवाडी ऐवजी दोडामार्ग” व अ.क्र. :- ३५ :- “औ.प्र. संस्था फुलंब्री, जि. औरंगाबाद” या संस्थेसमोर उपकोषागाराचे नांव “तळोदा” या ऐवजी “फुलंब्री” असे नमूद करण्यास शासनास विनंती केली आहे. संचालनालयाच्या विनंतीनुसार “प्रपत्र-अ” मधील अ.क्र. १२ समोर “उपकोषागार, सावंतवाडी” या ऐवजी “उपकोषागार दोडामार्ग” असे वाचण्यात यावे आणि अ.क्र. ३५ समोर “उपकोषागार तळोदा” या ऐवजी “उपकोषागार फुलंब्री” असे वाचण्यात यावे.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१०११६०५४०९००८ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vilas Ramchandra Wanjari

Digitally signed by Vilas Ramchandra Wanjari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vilas Ramchandra Wanjari
Date: 2015.01.01 16:15:30 +05'30'

**( विलास रा. वंजारी )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२) संचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

३) महालेखापाल ( लेखापरीक्षा) महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.

४) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

५) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

६) सर्व संबंधित जिल्हा कोषागार/उपकोषागार अधिकारी ( संचालनालयामार्फत).

७) कोप्र-५ कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

८) साशि-१ कार्यासन, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.

९) निवडनस्ती ( व्यशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.